**केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियानांतर्गत कार्यक्रमांसाठी सामाजिक विशेष घटकाकरीता (SCSP) सन २०१८-१९ साठी केंद्र हिश्श्यापोटी रू.५८७.०० लक्ष व राज्य हिश्श्यापोटी रु. ३९१.३३ लक्ष इतके अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एनएचएम-०८१८/प्र.क्र.४०६/आ-७**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : १७ जानेवारी, २०१९.

**वाचा :-**

१) केंद्र शासन, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. No. L.१९०१६/०२/२०१८-NUHM, दिनांक २८ नोव्हेंबर, २०१८.

२) केंद्र शासन, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. No. L.१९०१६/०२/२०१८-NUHM, दिनांक २८ नोव्हेंबर, २०१८.

३) संचालक, वित्त व लेखा, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे क्र.राआसोम/एफएमजी/ कें.रा.हि./७६०६८-७५/२०१८-१९, दिनांक ६ डिसेंबर, २०१८ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह, सर्व प्रकारच्या गरजूंना आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले. सन २०१४-१५ मध्ये केंद्र शासनाने आरोग्य विषयक सर्व केंद्र पुरस्कृत योजना एकत्रित करुन त्यास "राष्ट्रीय आरोग्य अभियान" असे नाव दिले. या राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आता राष्ट्रीय आरोग्य अभियान, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान व राष्ट्रीय रोग नियंत्रण कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत योजनांचा समावेश केला आहे. राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियानाकरीता सामाजिक घटकासाठी (SCSP) सन २०१८-१९ च्या मंजूर अर्थसंकल्पीत तरतुदीतून केंद्र व राज्य हिस्सा राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियानांतर्गत कार्यान्वित असलेल्या विविध कार्यक्रमाकरीता सामाजिक विशेष घटकाकरीता (SCSP) सन २०१८-१९ च्या मंजूर अर्थसंकल्पीत तरतुदीतून सन २०१८-१९ मधील केंद्र हिस्सा (पहिला हफ्ता) रु. २५०.०० लक्ष (रु. दोनशे पन्नास लक्ष फक्त) व राज्य हिस्सा (पहिला हफ्ता) रु.१६६.६६ लक्ष (रु. एकशे सहासष्ट लक्ष सहासष्ट हजार फक्त) इतका निधी शासन निर्णय दिनांक २४ ऑक्टोबर, २०१८ अन्वये राज्य आरोग्य सोसायटीस वितरीत करण्यात आला. तथापि, उर्वरीत तरतूदीतून दुसऱ्या हफ्त्यापोटी केंद्र हिस्सा रु. ५८७.०० (रु. पाचशे सत्याऐंशी लक्ष फक्त) व राज्य हिश्श्यापोटी रु. ३९१.३३ लक्ष (रु. तीनशे एक्याण्णव लक्ष तेहतीस हजार फक्त) इतका निधी राज्य आरोग्य सोसायटीस वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सदर बाबतचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

(रु. लाखात)

| अ.क्र. | तपशील | मागणी रक्कम |
|---|---|---|
| १ | आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ७८९, अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना (०१)(०४) राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान (केंद्र हिस्सा ६० %) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (२२१०F४९८) | ५८७.०० |
| २ | आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ७८९, अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना (०१)(०५) राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान (राज्य हिस्सा ४० %) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (२२१०F५०४) | ३९१.३३ |

२. सदरचा खर्च वर तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे संबंधित लेखाशीर्षाखालील चालू आर्थिक वर्ष सन २०१८-१९ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखविण्यात यावा. सदरील तरतूद खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१) निधी वितरणा बाबतच्या शासन निर्णयातील अटी व शर्तींची पूर्तता झाल्यानंतरच याबाबतचा निधी वितरीत करण्यात यावा.

२) सदरहू वितरीत केलेल्या निधीपैकी राज्य शासनाचा ७५ % निधी खर्च झाल्यानंतर त्याबाबतचे उपयोगीता प्रमाणपत्र सादर केल्याशिवाय दुसऱ्या हफ्त्याचा निधी वितरीत केला जाणार नाही.

३) मागील वर्षी व त्यापूर्वी वितरीत केलेल्या निधी संदर्भात लेखा परिक्षक / महालेखापाल यांचे कोणतेही आक्षेप नसावेत. असल्यास, आक्षेपांची पूर्तता झाल्याशिवाय चालू वर्षाचा पुढील निधी वितरीत करण्यात येवू नये.

४) सदरहू योजनेंतर्गत वस्तूंची खरेदी असल्यास वस्तू खरेदी करण्यापूर्वी खरेदी केलेल्या वस्तूंची नोंद डेड स्टॉक रजिस्टर मध्ये घेण्यात यावी. नियमित वापरात येणाऱ्या वस्तूंच्या बाबतीत त्यांचा योग्य वापर झालेला असेल व त्या वस्तू शिल्लक राहिलेल्या नाहीत याबाबतची खातरजमा करुनच पुढील वस्तू खरेदी करण्यात याव्यात.

५) खरेदी केलेल्या वस्तू प्रत्यक्ष प्राप्त झाल्यानंतर आणि त्या वस्तू सुस्थितीत आणि मागणीतील प्रमाणकानुसार प्राप्त झाल्याची खातरजमा केल्यानंतरच त्याबाबतची देयक अदा करण्यात यावेत.

६) सदरहू योजनेचा निधी प्रत्यक्षात लाभार्थ्यांना वितरीत / अदा करणे आवश्यक असल्यास तो निधी DBT अथवा ECS प्रणालीद्वारे वितरीत / अदा करण्यात यावा.

३. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी, मुंबई यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाच्या दिनांक २ एप्रिल, २०१८ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.८ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास

कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक २ एप्रिल, २०१८ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. सदरचे अनुदान सशर्त असून वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/ प्र.क्र.८५/ २०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

६. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५४९/अर्थोपाय, दिनांक १५ डिसेंबर, २०१८ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१९०११७१५२६३८७९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha Munjaji Bharose

Digitally signed by Varsha Munjaji Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b708981b5122e87c8346c4cc7468f821, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd85325223aceef69d02bd455b7ca6972491623e0, cn=Varsha Munjaji Bharose
Date: 2019.01.17 17:31:15 +05'30'

**( व.मुं. भरोसे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
६. सहाय्यक संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
७. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. वित्त विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१२.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१३. निवडनस्ती (आरोग्य-७) .